**मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक**
**विकास महामंडळ मर्यादित, मुंबई**
**सन २०१८-१९ साठी भाग भांडवल**
**अंशदान वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मौआम-२०१८/प्र.क्र.१०६/१८/का.८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०१९

वाचा -

१) अल्पसंख्याक विकास विभाग, शासन निर्णय क्र.: अविवि-२००८/ १७१०/प्र.क्र.२३०/०८/ का.८, दिनांक ०६ जून, २०१३.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र : अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र : अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २५ जानेवारी, २०१९.

प्रस्तावना :-

मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळाचे अधिकृत भाग भांडवल रु.५००.०० कोटीपर्यत वाढविण्यास दिनांक ०६ जून, २०१३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. आतापर्यंत महामंडळास रु.४२५.६९ कोटी भाग भांडवल देण्यात आले आहे. मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळाला भागभांडवली अंशदान, (४२३५०२३३) - अंशदान (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करिता अर्थसंकल्पिय अंदाजामध्ये रु.२५.०० कोटी (रुपये पंचवीस कोटी फक्त) इतका निधी भागभांडवल म्हणून अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. संदर्भाकीत क्रमांक ३ येथील वित्त विभागाच्या दिनांक २५ जानेवारी, २०१९ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पीत निधीच्या खर्चाची मर्यादा भांडवली लेख्यातील अनिवार्य खर्चाच्या बाबीवर ९०% व कार्यक्रमाच्या खर्चाच्या बाबीवर १००% एवढी विहित करण्यात आली आहे. त्यास अनुसरुन मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांना सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता रु.२५.०० कोटी च्या १००% म्हणजे रु.२५.०० कोटी (रुपये पंचवीस कोटी फक्त) इतके भागभांडवल वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय -</u>**

मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांना सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता रु.२५.०० कोटी (रुपये पंचवीस कोटी फक्त) इतका निधी भागभांडवल म्हणून वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त भागभांडवल मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ, मुंबई यांना प्रदान करण्यासाठी अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना 'आहरण व संवितरण अधिकारी' म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना याबाबतच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर महामंडळास उक्त रक्कम एकरकमी पध्दतीने त्वरीत अदा करण्यात यावी.

३. सदर रक्कमेचा ई.सी.एस. अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे नावे काढण्यात यावा.

४. वरील भाग भांडवली अंशदानाच्या अनुषंगाने होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

**लेखाशिर्ष :-**

मागणी क्रमांक झेडई-२,
४२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च
०२, समाजकल्याण,
१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक (योजनांतर्गत),
राज्य योजनांतर्गत योजना,
(०१) महामंडळांना सहाय्य,
(०१)(०२) मौलाना आझाद अल्पसंख्याक व वित्तीय विकास महामंडळाला भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम)
(४२३५ ०२३३)
३२ अंशदान.

५. मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळास उपलब्ध करुन देण्यात आलेल्या भागभांडवलाचे प्रमाणपत्र (शेअर सर्टिफिकेट) महामंडळाने शासनास सादर करावे. कर्ज वसुलीबाबत सर्व उपाययोजना प्रभावीपणे राबविण्यात याव्यात. नवीन कर्जाच्या अर्जांचे ऑन लाईन नोंदणीकरण, कर्ज मंजूरी आदेशासोबत लाभार्थ्यांस व जामिनदारास कर्ज परतफेड तक्ता देण्यात यावा. सदर भाग

भांडवल हे योजनांतर्गत निधीतील असल्यामुळे अल्पसंख्याक विकास विभाग व वित्त विभागाद्वारे मंजूर केलेल्या योजनांवरच हा निधी खर्च करण्यात यावा. सदरचा खर्च करण्यापूर्वी यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील अटींची तसेच वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांची पूर्तता करण्यात यावी.

६. निधी खर्च करताना तो विहीत कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे / टेंडर नियमावली व नियमांचे / प्रक्रियेचा अवलंब करुन / वित्तीय अधिकारांच्या (financial power) मर्यादेत / PWD मॅच्युअलचे अधीन राहून/ C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार / प्रचलित शासन निर्णय / नियम / परिपत्रक/ तरतूदीनुसार / बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम / अधिकाराचा भंग /अटी व शर्तीचा भंग होणार नाही याची जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ यांची राहील.

७. “वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक ०२.०४.२०१८ व संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक २५ जानेवारी, २०१९ च्या शासन परिपत्रकामधील अटींची पुर्तता करण्यात आली आहे.”

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१९०२१११६००२११८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, 2.5.4.45=032100CD9D66225CED8BAE27E0E1249D39EC14A54419D0A13504B49333B23F92B58199, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2019.02.11 16:02:47 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व परीक्षा), मुंबई
३) सह सचिव / उप सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४) व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (रोख शाखेमार्फत)

६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई

७) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मुंबई

८) वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४, व्यय -४ व साउ) मंत्रालय, मुंबई

९) नियोजन विभाग (कार्या.१४७५)

१०) अवर सचिव, कार्यासन-७, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी उक्त रक्कम B.D.S. वर तात्काळ उपलब्ध करुन द्यावी.

११) रोख शाखा, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१२) निवड नस्ती, कार्यासन-८.